गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.१४१/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०४ जुलै, २०२३.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र जा.क्र.का.प्र.आ./३४५३, दिनांक-१९/०६/२०२३.

**प्रस्तावना** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, गोंदिया यांनी सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, गोंदिया यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, गोंदिया यांचा ठराव विचारात घेऊन गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील खालील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नाव | साखळी क्रंमाक | दर्जोन्नत करावयाची एकुण लांबी (कि.मी.) | प्रस्तावित ग्रा.मा.क्रंमाक |
|---|---|---|---|---|
| | **तालुका-गोंदिया** | | | |
| १. | कुडवा ते स्मशानभुमी रस्ता. | ०/०० ते १/०० | १.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र.४५० |
| २. | बाजारटोली -बघोली रस्ता. | ०/०० ते २/०० | २.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र.४५१ |
| ३. | नवाटोला ते भादयाटोला रस्ता. | ०/०० ते २/०० | २.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र.४५२ |
| ४. | बाजारटोला ते नवाटोला रस्ता. | ०/०० ते ३/०० | ३.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र.४५३ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५. | गणेशनगर ते सेलटॅक्स कॉलनी रस्ता. | ०/०० ते १/५०० | १.५०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र.४५४ |
| ६. | गोंदिया बालाघाट प्रजिमा -११ ते मुरपार ते गोंदिया रस्ता. | ०/०० ते ३/०० | ३.०० कि.मी | ग्रामीण मार्ग क्र.४५५ |
| ७. | गोंदिया आमगांव रामा -३३५ ते खमारी स्मशानभुमी पोच रस्ता. | ०/०० ते १/०० | १.०० कि.मी | ग्रामीण मार्ग क्र.४५६ |
| ८. | तांडाटोली इजिमा-३९ ते तांडाटोली स्मशानभुमी रस्ता. | ०/०० ते १/५०० | १.५०० कि.मी | ग्रामीण मार्ग क्र.४५७ |
| ९. | गोंदिया आमगांव रामा-३३५ ते अदासी पशुवैद्यकीय दवाखाना दागोटोला रस्ता. | ०/०० ते ०/६०० | ०.६०० कि.मी | ग्रामीण मार्ग क्र.४५८ |
| **एकूण** | | | **१५.६०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील गोंदिया जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **१५.६०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३९८३.७१० + १५.६००) म्हणजेच **३९०९.३१० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७०६१२३९१४७४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.07.06 12:43:08 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नगपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२)जिल्हाधिकारी, गोंदिया.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.